**उप विभागीय अभियंता या पदावरुन कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नती / पदस्थापना.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन आदेश क्रमांकः पीओजी-१९२०/ प्र.क्र. १२६ (७)/ सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १२ नोव्हेंबर, २०२०

**पहा :** शासन निर्णय,पाटबंधारे आणि वीज विभाग क्र.जीएबी-१०७०-ई (१), दिनांक १९.१२.१९७०

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत उप विभागीय अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील श्री. संजय नामदेवराव देसाई, उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, पलूस, जि. सांगली यांना संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहित केलेल्या सेवाप्रवेश नियमानुसार, कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर { वेतनस्तर एस-२३ : ६७७००-२०८७००) (असुधारित वेतनसंरचना पी.बी.-३ वेतनबँड रूपये १५६००-३९१०० ग्रेड वेतन ६६००)} या वेतनश्रेणीत निवडसूचीच्या क्रमानुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून श्री. देसाई यांच्या सविस्तर पदस्थापनेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

२. श्री. सं. ना. देसाई यांची सदर पदोन्नती ही पुढे नमूद केलेल्या बाबींच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे :

i. वरील पदोन्नती ही मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे राज्य शासनाने दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील मा. सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

ii. सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने पदोन्नतीच्या परिणामी त्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क राहणार नाही.

३. श्री. सं. ना. देसाई यांना देण्यात आलेली सदर पदोन्नती ही कोणतीही पूर्वसूचना किंवा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११२१७१७३८१८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kisanrao Babanrao Palande

Digitally signed by Kisanrao Babanrao Palande
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514911d765e05f227cdbfc15f18f6435e0084f5963 7ab95f9aefeebc40be45e7, cn=Kisanrao Babanrao Palande
Date: 2020.11.12 17:19:32 +05'30'

**( किसनराव पलांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
१. सचिव, राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / कोकण/ पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती/ नागपूर,
३. मुख्य अभियंता व सह सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
७. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
८. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. श्री. सं. ना. देसाई, उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, पलूस, जि. सांगली,
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली,
१२. सामान्य प्रशासन विभाग, का.-१२/१६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१५. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१६. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१७. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१८. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१९. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. कार्यासन आस्था-१, आस्था-३, सेवा-६, संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१. निवडनस्ती.